**राज्यातील खाजगी संस्थांकडील धरणांची तपासणी केल्याप्रीत्यर्थ आकारावयाच्या शुल्कामध्ये सुधारणा**

**महाराष्ट्र शासन,**
**जलसंपदा विभाग,**
शासन निर्णय क्र. धसुसं २००८/(३३४/०८)/सिंव्य(कामे),
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २३ नोव्हेंबर २००९

**प्रस्तावना :-**

जलसंपदा विभागाच्या नियंत्रणाखालील धरणांव्यतिरिक्त राज्यात अन्य विभागांच्या अधिपत्याखाली तसेच खाजगी संस्था व सार्वजनिक उपक्रम यांच्या मालकीची काही धरणे आहेत.सुरक्षिततेच्या दृष्टीने या धरणांचे नियंत्रण व पर्यवेक्षण करणे आवश्यक आहे. यामध्ये धरण तपासणी हे महत्वाचे काम आहे. तपासणीमध्ये स्थापत्य घटक व यांत्रिकी घटक यांचा समावेश होतो. अपुऱ्या देखभालीमुळे, परिरक्षणातील उणीवांमुळे व नियंत्रणाबाहेरील घटकांमुळे धरणांमध्ये गंभीर त्रुटी निर्माण होतात. त्याचे पर्यवसान धरणांच्या सुरक्षिततेला गंभीर धोका पोहोचणे यामध्ये तर कधी कधी धरणफुटीमध्ये होण्याची शक्यता असते. परिणामी धरणांच्या खालील क्षेत्रातील लोकवस्तीला धोका पोहोचून मालमत्ता व जीवित हानी होते. यासाठी धरणांची नियतकालिक तपासणी होणे आवश्यक ठरते.

खाजगी धरणांची वार्षिक नियतकालिक तपासणी जलसंपदा विभागाच्या अधिका-यांनी वर्षातून २ वेळा (मान्सूनपूर्व व मान्सूनोत्तर) करण्याबाबत शासन निर्णय क्र. धसुसं २००५/(१२७/०५)/सिंव्य(कामे), दि. ६ नोव्हेंबर २००६ अन्वये निर्देश देण्यात आलेले आहेत. या कामासाठी काही तपासणी शुल्क खाजगी संस्था व सार्वजनिक उपक्रम यांनी जलसंपदा विभागाला प्रदान करणे आवश्यक आहे. या कामासाठीचे तपासणी शुल्क शासन निर्णय क्र.डीएमएस १०८७/९२/सिंव्य(कामे), दिनांक २० जुलै २००१ अन्वये २००४-०५ या वर्षापर्यन्त खाजगी अभिकरणांकडून वसूल करण्यात येत होते. त्या पुढील वर्षात अशी शुल्क आकारणी काय दराने करावी याबाबत सुधारित दर निर्धारित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय :-**

खाजगी संस्था तसेच सार्वजनिक उपक्रम यांच्या स्वामित्वाखाली असलेल्या धरणांची वार्षिक नियतकालिक तपासणी जलसंपदा विभागाच्या सक्षम घोषित केलेल्या अधिकाऱ्यांकडून करुन घेण्यात येते. सन २००५-०६ पासून या तपासणी प्रीत्यर्थ पुढील दराने शुल्क आकारण्यात यावे :-

(रुपये)

| आर्थिक वर्ष | संवर्ग-१ धरणे | संवर्ग-२ धरणे |
|---|---|---|
| २००५-०६ | ४४००० | २२००० |
| २००६-०७ | ४८४०० | २४२०० |
| २००७-०८ | ५३२४० | २६६२० |
| २००८-०९ | ५८५६४ | २९२८२ |
| २००९-१० | ६४४२० | ३२२१० |

वरील दर खालील अटींच्या अधीन राहतील :-

१) स्थापत्य व यांत्रिकी घटकांची तपासणी वेगवेगळयावेळी करण्यात आली तरी ती एकच तपासणी मानण्यात येईल व शुल्कासाठी एकदाच धरली जाईल.

२) तपासणी पथकातील शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या दैनिक भत्त्या प्रीत्यर्थ व वाहतूक, इंधन इ. खर्च मिळून प्रति तपासणी रु. ६०००/- खाजगी संस्थेला देय राहतील. स्थापत्य व यांत्रिकी मिळून एकच तपासणी दौरा धरला जाईल.

३) या व्यतिरिक्त सेवाशुल्क वेगळे देय राहील.

४) निर्धारित करण्यात आलेले दर पूर्वलक्षी प्रभावाने लागू होतील.

हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४०२/व्यय-१२, दिनांक ५/१०/२००९ नुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २००९११२३१३५७०१००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

प्रदेशपांडे
**( प्र.र.देशपांडे )**
शासनाचे अवर सचिव

प्रत,
प्रधान सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई,
सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई, ,
सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई, ,
सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई, ,
सचिव नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई, ,
महासंचालक, मेरी, नाशिक
सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ४ था मजला, एक्सप्रेस टॉवर,नरीमन पॉईन्ट, मुंबई,
मुख्य अभियंता (यां), जलसंपदा विभाग, नाशिक,
आयुक्त, मुंबई महानगरपालिका, मुंबई,

मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई,
मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती,
मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर), येरवडा, पुणे
मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, कोपरी, ठाणे (पूर्व),
मुख्य अभियंता, चंद्रपूर औष्णिक विद्युत केंद्र, चंद्रपूर,
आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर
आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका, कोल्हापूर,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक, दूग्ध बांधकाम मंडळ, आरे, मुंबई,
मे.टाटा हायड्रो इलेक्ट्रीक सप्लाय कंपनी, लोणावळा,
अधीक्षक अभियंता, धरण सुरक्षितता संघटना, नाशिक,
अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्त), मंडळ,ठाणे
अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्त), मंडळ,पुणे,
कार्यकारी अधिकारी, नगर परिषद, जालना,
कार्यकारी अधिकारी, कागल नगर परिषद, कागल जि.कोल्हापूर,
सिंव्य(कामे) संग्रहार्थ.,